शासन व्यवहारात राजभाषा मराठीचा वापर -
मंत्रालयीन स्तरावरील इंग्रजी पत्रव्यवहार.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक-मभावा-१०८६/प्र-६४/२०,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, १९८६.

प रि प त्र क

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-मभावा-१०८४/प्र-२७१/२०, दिनांक २० ऑगस्ट, १९८४ मधील तरतुदीनुसार राजभाषा मराठीच्या वापरा-संदर्भातील शासकीय धोरणांची परिणामकारक अंमलबजावणी करण्याचे काम विभागीय आयुक्तांकडे सुपूर्द करण्यात आले आहे. त्यानुसार विभागीय आयुक्तांकडील तपासणी पथकाने प्रत्येक कार्यालयाची मराठीच्या वापरासंबंधात तपासणी करून दर तिमाहीला तपासणी अहवाल शासनाला सादर करावयाचा असतो. या तपासणी पथकाने शासनाला जे अहवाल सादर केले आहेत त्यामध्ये प्रामुख्याने मंत्रालयीन विभागांकडून, विभागीय/जिल्हा/तालुका स्तरावर, होणारा अधिकांश पत्रव्यवहार इंग्रजीतून होत असल्याचे स्पष्ट केले आहे आणि त्यामुळेच विभागीय कार्यालयांतून इंग्रजीचे प्रमाण कमी होत नाही असे कारण पुढे केलेले आहे.

२. मंत्रालयीन स्तरावरून अजूनही पत्रव्यवहार इंग्रजीतून होत असेल तर ही बाब निश्चितच आक्षेपार्ह आहे. वर्जित प्रयोजने वगळता सर्व पत्रव्यवहार फक्त मराठीतूनच झाला पाहिजे असे आदेश असतानाही त्याचे पालन होत नाही. हे आश्चर्यकारक आहे. यापुढे जे अधिकारी/कर्मचारी या आदेशाचे पालन करणार नाहीत, त्याचेविरुद्ध शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक मभावा-१०८०/५४/२०, दिनांक १८ मे १९८२ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्याच्या सूचना सर्व संबंधितांना पुन्हा देण्यात येत आहेत. या सूचनेचे विभागात काटेकोर पालन न झालेले तपासणीत किंवा या विभागाकडे येणा-या इंग्रजी पत्रव्यवहारावरून दिसून आले तर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक मभावा-१०८३/१३५८/२०, दिनांक २८.१२.८३ मधील तरतुदीनुसार मंत्रालयीन विभागातील सह/उप/अवर सचिव [आस्थापना]

कृमाप....

तसेच विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना त्याबाबत जबाबदार धरून त्यांचेविरूध्द कारवाई करण्याचे सुचवावे लागेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ म. ना. बर्वे ]
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

१] मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय,

२] सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,

३] शासनाचे सर्व सचिव,

४] सर्व मंत्रालयीन विभाग,

५] सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभागाध्यक्ष,

६] निवड फाईल [ २ प्रती ],

७] सर्व साधारण फाईल [ २ प्रती ].

भा. सं. / चौधा

माहितीकरता सादर. फाईल करण्यास हरकत नसावी.

स. सं. (श्री आ)

उ सं. (श्री ...)

सह/सं.

भा/सं